अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना सन २०१५-१६ या शैक्षिणिक वर्षाकरीता शहरातील नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देण्याकरिता संस्था / शाळांची निवड करण्याबाबत

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः नानिशा-२०१५/प्र.क्र.२११/का.१२
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२

**तारीख: १९ सप्टेंबर,२०१५**

वाचा -

१) आदिवासी विकास विभाग,शासन निर्णय क्र.शाआशा-२००८/प्र.क्र.८१/का.१३, दि.२८.०८.२००९.

२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.नानिशा-२०१५/प्र.क्र.११८/का-१२, दि.२१.०४.२०१५

३) प्रधान सचिव (आदिवासी विकास) यांचे अध्यक्षतेखाली दि.०३.०८.२०१५ रोजी आयोजित करण्यात आलेली सचिव समितीची बैठक

**शासन निर्णय -**

इयत्ता पहिली ते बारावीपर्यंतच्या अनूसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शहरातील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देण्याचा निर्णय संदर्भ क्र. १ वरील दि.२८.०८.२००९ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. तसेच संदर्भ क्र. २ वरील दि.२१.०४.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये केलेल्या सुधारणांस अनुसरून विभागास इयत्ता १ ली व ५ वी करिता प्राप्त झालेल्या इंग्रजी माध्यमाच्या नामांकित शिक्षण संस्थांच्या प्रस्तावाची तपासणी करण्यात आल्यानंतर विहित निकष पुर्ण करीत असलेल्या खाली नमूद केलेल्या संस्थांना विहित अटी व शर्तीच्या अधिन राहून अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना सन २०१५-१६ या शैक्षणिक वर्षासाठी इयत्ता १ ली व ५ वी मध्ये प्रवेश देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे नाव व पत्ता | नामांकीत शाळेचे नाव व पत्ता |
|---|---|---|
| १. | प्रसाद ग्रामिण शिक्षण संस्था, गणेगांव पो. गुहा ता. राहूरी जि. अहमदनगर | श्री बाळासाहेब वाणी सेंट्रल स्कुल गणेगाव पो. गुहा ता. राहूरी जि. अहमदनगर. |
| २. | धन्वंतरी मेडीकल एज्युकेशन फाऊंडेशन, अहमदनगर. | आयझॅक पब्लिक स्कूल, भाळवणी, ता.पारनेर, जि.अहमदनगर. |
| ३. | सेंट्रल हिंदू मिलीटरी एज्युकेशन सोसायटी, भोसला भवन, डॉ.मुंजे मार्ग, नाशिक. | भोसला मिलीटरी स्कूल, समर्थनगर, रामभूमी, नाशिक. |
| ४. | सेंट्रल हिंदू मिलीटरी एज्युकेशन सोसायटी, भोसला भवन, डॉ.मुंजे मार्ग, नाशिक. | भोसला मिलीटरी गर्ल्स स्कूल, समर्थनगर, रामभूमी, नाशिक. |
| ५. | श्री.ह.भ.प. शंबरबुवा चौधरी शैक्षणिक संस्था, चिमठाणे, ता.शिंदखेडा, जि.धुळे. | सुरूची इंग्लीश प्रायमरी स्कूल, चिमठाणे, ता.शिंदखेडा, जि.धुळे. |

| | | |
|---|---|---|
| ६. | श्रीकृष्ण बहुउद्येशिय सेवा समिती, आरमोरी, जि.गडचिरोली. | पॅराडाईज इंग्लिश स्कूल, आरमोरी, जि.गडचिरोली. |
| ७. | सरस्वती शिक्षण प्रसारक मंडळ, गडचिरोली. | कुथेपाटील कॉन्व्हेंट इंग्रजी माध्यम, देसाईगंज (वडसा), जि.गडचिरोली. |
| ८. | प्रगतीशील बहुउद्येशिय संस्था, वाशिम. | एंजल्स पॅराडाईज इंग्लिश मेडीयम स्कूल, केळझर, ता.सेलू, जि.वर्धा. |
| ९. | विद्याप्रबोधिनी बहुउद्येशिय शिक्षण संस्था, रामेश्वरी, जि.नागपूर. | सेंट्रल प्रोव्हिजनल स्कूल, रामेश्वरी, जि.नागपूर. |

**विहित अटी व शर्ती :-**

(अ) संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी दि.२१.०४.२०१५ रोजीच्या शासन निर्णयानुसार निर्धारित केलेल्या शुल्काप्रमाणे शाळांची वर्गवारी ठरवून त्यांचे शुल्क निश्चित करावे.

(ब) संबंधित संस्था शासनाला सादर केलेल्या प्रस्तावात नमूद केल्याप्रमाणे सर्व सोयी सुविधा देण्यास तयार आहेत याची खातरजमा संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी करावी व संस्थेकडून तसे हमीपत्र घ्यावे.

(क) संस्थेने आदिवासी विद्यार्थ्यांसाठी वेगळी तुकडी / वर्ग सुरु करणे अपेक्षित नाही. त्यांनी सुरु असलेल्या तुकडी /वर्गामध्येच विद्यार्थ्यांना प्रवेश देणे बंधनकारक राहील.

(ड) प्रकल्प अधिकारी यांनी विद्यार्थी प्रवेशित करताना संबंधित प्रकल्पातील शाळांना प्राधान्य द्यावे.

(इ) एकाच संस्थेने एकापेक्षा अधिक प्रकल्पातून प्रस्ताव सादर केल्याचे आढळून आलेले आहे. तरी सदर संस्थांमध्ये विद्यार्थी प्रवेशित करताना संस्था ज्या प्रकल्पातील आहे त्या प्रकल्पातील विद्यार्थ्यांना प्रवेशासाठी प्राधान्य देण्यात यावे. उर्वरित प्रकल्पांतून सदर संस्थेमध्ये विद्यार्थी प्रवेशित करताना, सदर संस्थेची वसतीगृह क्षमता तसेच अतिरिक्त वर्ग तुकडीस शालेय शिक्षण विभागाची मान्यता लक्षात घेऊन इतर प्रकल्पांशी समन्वयाने विद्यार्थी प्रवेशित करण्यात यावेत. संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास यांनी याबाबत पर्यवेक्षण करावे.

(ई) ज्या नामांकित शाळांमध्ये सदर योजनेंतर्गत विद्यार्थ्यी देण्यात आले आहेत अशा नामांकीत शाळांच्या मुख्याध्यापकांसमवेत संबंधित प्रकल्प अधिकारी वा अपर आयुक्तांनी प्रत्येक शैक्षणिक वर्षात माहे जून, ऑक्टोंबर व फेब्रुवारी मध्ये बैठक घेऊन प्रवेशित विद्यार्थ्यांची प्रगती व समस्यांबाबत आढावा घ्यावा.

(फ) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.शाआशा-२००८/प्र.क्र.८१/का.१३, दि.२८.०८.२००९ व आदिवासी विकास विभाग,शासन निर्णय क्र.नानिशा-२०१५/प्र.क्र.११८/का-१२, दि.२१.०४.२०१५ मध्ये विहित केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करावे.

२) ज्या नामांकित संस्थेत अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांस प्रवेश देण्यात येणार आहे, त्या संस्थेबरोबर संबंधित प्रकल्प अधिका-यांनी करारनामा करावा. तसेच त्यामध्ये मुलांचे शिक्षण, आरोग्य,

सुरक्षा, निवास, आहार व अन्य सुविधा तसेच संस्थेच्या प्रस्तावातील सर्व सोयी सुविधा या मुद्यांचा समावेश करण्यात यावा.

३) नामांकित इंग्रजी शाळेत अनुसूचित जमातीचे विद्यार्थ्यांची प्रवेश प्रक्रिया पुर्ण झाल्यानंतर वर्गवारीनुसार अनुज्ञेय असलेले ५० टक्के शुल्क संस्थेस अदा करण्यात यावे. उर्वरित ५० टक्के शुल्क शैक्षणिक वर्षाच्या शेवटच्या सत्राच्या परिक्षेपूर्वी संस्थेस अदा करण्यात यावे. या योजनेची अंमलबजावणी संबंधित प्रकल्प अधिकारी करतील तसेच संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास योजनेचे "पर्यवेक्षकीय अधिकारी" म्हणून व आयुक्त, आदिवासी विकास नाशिक हे "नियंत्रक अधिकारी" म्हणून जबाबदारी पार पाडतील.

४) या योजनेसाठी होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली करण्यात यावा.

" मागणी क्र. टी ५
२२२५- अनुसूचित जाती, जमाती व इतर मागास वर्ग यांचे कल्याण-
पंचवार्षिक योजनेअंतर्गत योजना-
जनजाती क्षेत्र उपयोजना-
०२- अनुसूचित जमातीचे कल्याण
७९६ जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना-
राज्य योजनांतर्गत योजना
(०२) जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना
(०२) (२९) अनुसूचित जमातीच्या विदयार्थ्यांना इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देणे.
(२२२५ C-९९९) ३१ " सहायक अनुदाने (वेतनेत्तर) "

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९२३१६४८३९५२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2015.09.23 16:53:49 +05'30'

**( सु.ना.शिंदे )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१. मा.मंत्री, (आदिवासी विकास/मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव.

२. अपर मुख्य सचिव, (शालेय शिक्षण विभाग) यांचे स्वीय सहाय्यक.

३. प्रधान सचिव, (वित्त विभाग) यांचे स्वीय सहाय्यक.

४. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.

५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/नागपूर/अमरावती/ठाणे.

६. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.

७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षा)/ महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

९. सर्व संबंधित संस्था/शाळा.

१०. निवड नस्ती का-१२